**कौटुंबिक न्यायालय, सोलापूर यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

## शासन निर्णय क्रमांक :कौटुंन्या १११८/प्र.क्र.४८/का- नऊ

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक:- ०३ ऑक्टोबर, २०१८.

**पहा-** १) न्यायाधीश,कौटुंबिक न्यायालय, सोलापूर यांचे पत्र जा.क्र.९००/२०१८, दि.२०.०८.२०१८

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८.

**प्रस्तावना :-**

कौटुंबिक न्यायालय, सोलापूर यांनी संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये सदर न्यायालयाच्या आस्थापनेवरील ३ अस्थायी पदांना पुढील मुदतवाढ देण्याची शासनास विनंती केली आहे. संदर्भ क्र. २ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दि.०१.१०.२०१८ पासून दि.२८.०२.२०१९ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार कौटुंबिक न्यायालय, सोलापूर येथील ३ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कौटुंबिक न्यायालय, सोलापूर यांच्या आस्थापनेवरील लिपिक टंकलेखक (१ पद), शिपाई/पहारेकरी (१ पद) आणि वाहन चालक (१ पद) अशा एकूण ३ अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१८ पासून दि.२८.०२.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. याकरिता येणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान-१०५ दिवाणी व सत्र न्यायालये-(०१)(०२) प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, संकेतांक २०१४ ०३४१, ०१- वेतन या लेखाशिर्षाखाली" खर्ची टाकण्यात यावा व तो त्या शीर्षाखालील सन २०१८-२०१९ या वर्षासाठी मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८ द्वारे प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१८१००४१२४५२११७१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Amogh Shyamkant Kaloti

Digitally signed by Amogh Shyamkant Kaloti
DN: CN = Amogh Shyamkant Kaloti, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Law and Judiciary Department
Date: 2018.10.04 12:50:26 +05'30'

**(अ. श्या. कलोती)**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति,**

१) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई ,
२) प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय,सोलापूर,
३) महालेखापाल-एक (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
४) महालेखापाल-एक ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र,मुंबई,
५) जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर,
६) वित्त विभाग व्यय-५,
७) विधि व न्याय विभाग कार्यासन-२३, २४ व २५
८) निवड नस्ती.